शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,रत्नागिरी येथील मुला-मुलींचे वसतीगृह तसेच अधिकारी / कर्मचारी वसाहत येथे CCTV यंत्रणा बसविणे या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीआर-२०२५/प्र.क्र.१०२/प्रशा-१,
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : १२ मार्च, २०२५

**वाचा :** आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/ शावैमरत्नागिरी /सी.सी.टी.व्ही.प्रस्ताव/११६८/आय-प/२५, दिनांक १०.०२.२०२५

**शासन निर्णय :**

विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, रत्नागिरी येथील मुला-मुलींचे वसतीगृह तसेच अधिकारी / कर्मचारी वसाहत येथे CCTV यंत्रणा बसविणे या कामासाठी रुपये १,२४,८३,३१२/- (रुपये एक कोटी, चोवीस लक्ष, त्र्याऐंशी हजार, तीनशे बारा फक्त) (सर्व करांसहीत) इतक्या रक्कमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बांधकामाचे नाव | अंदाजित किंमत (सर्व करांसहीत) |
|---|---|---|
| १ | Providing CCTV System at District Civil Hospital Ratnagiri, Tal & Dist.Ratnagiri | ५४,२६,६९९ |
| २ | Providing & Maintaining CCTV System at Medical College Udyamnagar Ratnagiri, Tal. & Ratnagiri | २९,३०,६५५ |
| ३ | Providing & Maintaining CCTV System at Medical College Staff Residential 10 Buildings Udyamnagar Ratnagiri, Tal. & Ratnagiri | ४१,२६,०५८ |
| | एकूण | १,२४,८३,४१२ |

**अटी :-**

१) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी. तसेच सदर प्रशासकीय मान्यता वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१०१/२४/कोषा-प्रशा-५, दिनांक १७.०१.२०२५ मधील अटींचे पालन करण्याच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

२) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

३) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३ /प्र.क्र.१७७ / तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) विद्युतीकरण कामाच्या कालावधीतच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

६) प्रस्तावित उपरोक्त काम ज्या इमारतींवर करण्यात येणार आहे त्या इमारती सदर काम करण्यासाठी सुरक्षित व मजबूत आहे, याबाबत सक्षम प्राधिका-याची मान्यता घेण्यात यावी.

७) विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१२१०४६३२५११३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2025.03.12 15:23:50 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) आयुक्त(वैद्यकीय शिक्षण) , वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
२) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम, कोकण विभाग.
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई

५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग, रत्नागिरी
६) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, रत्नागिरी
७) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी
८) निवडनस्ती (प्रशा-१)